**शासकीय कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय/ संस्था यामधील सहयोगी प्राध्यापक यांची कॅस योजनेंतर्गत प्राध्यापक (AL१३A ते AL१४) मध्ये स्थाननिश्चिती करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीएएस -२०२२/प्र.क्र. २७ /मशि १**
मादामा कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२
दिनाक : २४ जानेवारी, २०२२

**वाचा :** १. केंद्र शासन, मानव संसाधन विकास मंत्रालय यांचे पत्र क्र. १-७/२०१५-यु.II, दि(१), दि. ०२.११.२०१७.
२. विद्यापीठ अनुदान आयोगाची अधिसूचना क्र. एफ १-२/२०१७(EC/PS), दि. १८.०७.२०१८.
३. केंद्र शासन, मानव संसाधन विकास मंत्रालय यांचे पत्र क्र. १-४/२०१७-यु.II, दि. २८.०१.२०१९
४. शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. संकीर्ण-२०१८/प्र.क्र.५६/विशि-१, दि. ०८.०३.२०१९ व दि. १०.०५.२०१९.
५. संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचे पत्र क्र. उशिसं/२०२२/कॅस/प्रशा-१/६६५, दि. १९.०१.२०२२.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाच्या मानव संसाधन विकास मंत्रालयाने संदर्भाधिन क्र.१ येथील दि. ०२.११.२०१७ च्या पत्रान्वये विद्यापीठ तसेच महाविद्यालयातील शिक्षकीय पदांची वेतनश्रेणी ७ व्या वेतन आयोगानुसार सुधारित करणेबाबत सूचित केले आहे. विद्यापीठ अनुदान आयोगाने संदर्भाधिन क्र.२ येथील दि. १८.०७.२०१८ च्या अधिसूचनेन्वये विद्यापीठ तसेच महाविद्यालयातील शिक्षकीय पदांना ७ वा वेतन आयोग लागू केला असून, त्यामध्ये सेवांतर्गत प्रगती योजनाही (Career Advancement Scheme) लागू केली आहे. त्यानुसार राज्यातील शासकीय कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय/ संस्था आणि शासकीय अध्यापक महाविद्यालये यामधील अध्यापकांना ७ व्या वेतन आयोगातील तरतुदी संदर्भाधिन क्र.४ येथील दि.०८.०३.२०१९ व दि. १०.०५.२०१९ च्या शासन निर्णयान्वये लागू करण्यात आलेल्या आहेत.

राज्यातील शासकीय कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय/संस्था आणि शासकीय अध्यापक महाविद्यालये यामधील अध्यापकांना प्राध्यापक पदावर स्थान निश्चिती करण्यासाठी शासन निर्णय क्र. एससीपी -२०२१/ प्र.क्र.२१/मशि-१, दि. ०७.०६.२०२१ अन्वये निवड समिती गठीत करण्यात आली आहे. सदर समितीच्या दि. १९.०१.२०२२ रोजीच्या बैठकीत समितीने केलेल्या शिफारसी विचारात घेवून, संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधिन क्र.५ येथील पत्रान्वये शासकीय कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय/ संस्था यामधील सहयोगी प्राध्यापक यांची प्राध्यापक पदावर AL१३A ते AL१४ मध्ये स्थाननिश्चिती करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

शासकीय कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय/ संस्था यामधील सहयोगी प्राध्यापक यांची प्राध्यापक पदावर AL१३A ते AL१४ मध्ये स्थाननिश्चिती करणेसंदर्भात विद्यापीठ अनुदान आयोगाची अधिसूचना क्र. एफ १-२/२०१७(EC/PS), दि. १८.०७.२०१८ मधील तरतुदींची पुर्तता करणाऱ्या खालील सहयोगी प्राध्यापक यांना त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या दिनांकापासून सेवांतर्गत प्रगती योजनेतंर्गत (Career Advancement Scheme) स्थान निश्चिती करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

| अ. क्र. | सहयोगी प्राध्यापकाचे नाव | विषय | संस्था/ महाविद्यालयाचे नाव | प्राध्यापक पदासाठी शिफारस करण्यात आलेला दिनांक (AL-१३ A ते १४) |
|---|---|---|---|---|
| १ | श्रीम. अंजली पाटील | वनस्पतीशास्त्र | राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर | दि. १९.०१.२०२२ |
| २ | श्री. बी. डी. भोसले | रसायनशास्त्र | राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर | दि. १९.०१.२०२२ |
| ३ | श्री. मोहम्मद इद्रिस मो. सिद्दिकी | रसायनशास्त्र | शासकीय विज्ञान संस्था, नागपूर | दि. १९.०१.२०२२ |

२. वरील अध्यापकांची वेतन निश्चिती करण्याची कार्यवाही संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे हे करतील.

३. यासाठी येणारा खर्च, शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग ,क्र. संकीर्ण- २०१८/ प्र.क्र.५६/विशि-१, दि. ०८.०३.२०१९ मध्ये दर्शविलेल्या संबंधित अर्थसंकल्पीय लेखाशिर्षाखाली खर्ची दर्शविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२४१५३७११८००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DATTATRAYA RAMBHAU KAHAR

Digitally signed by DATTATRAYA RAMBHAU KAHAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER & TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=44c81ed7c5650383de2d3bd4939feb17be94c77ddf9380bfe3d4af1d10cfd393, serialNumber=6c5292c043ebba90984d77378c6e4fb506d9694e3e8f08dd386c5d3f42e79b10, cn=DATTATRAYA RAMBHAU KAHAR
Date: 2022.01.24 15:38:40 +05'30'

( द. रा. कहार )
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/ नागपूर
६. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. सर्व प्राचार्य/संचालक, शासकीय महाविद्यालये/संस्था.
९. सर्व प्राचार्य, शासकीय अध्यापक महाविद्यालये.
१०.सर्व संबंधित सहयोगी प्राध्यापक, यांना संबंधित प्राचार्य/संचालक यांच्यामार्फत
११.निवडनस्ती/मशि-१